नायब तहसीलदार “गट-ब” संवर्गातील २५ परिविक्षाधीन उमेदवारांकरीताअधिसंख्य पदे निर्माण करणेबाबत...

**महाराष्ट्र शासन**

**महसूल व वन विभाग**

**शासन निर्णय क्रमांक:- ईएसटी-२०१९/प्र.क्र.१३७/ई-८**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक : १३ डिसेंबर, २०२१.

**संदर्भ**:-१) वित्त विभाग, शासन निर्णय क्र.पदनि-२०१६/प्र.क्र.७/१६/वित्तीय सुधारणा-१,दि.२०/०२/२०१६.

२) सामान्य प्रशासन विभाग,शासन निर्णय,क्र. टिआरएन-२०१३/प्र.क्र.८४/१३/१२-अ, दि.२०/०१/२०१४.

३) सामान्य प्रशासन विभाग, पत्र क्र. टिआरएन-०६१८/प्र.क्र.५१/सीपीटीपी-ब,दि.२२/११/२०१९ व दि.१६/११/२०१९.

४) वसंतराव नाईक राज्य कृषि विस्तार व्यवस्थापन व प्रशिक्षण संस्था, नागपूर यांचे पत्र क्र. वनामती/सीपीटीपी२०१९/ठोक वेतन/लेखा-४,३१२५ दि.१६/१०/२०१९.

५) महसूल व वन विभाग,शासन निर्णय क्र.ईएसटी-२०१९/प्र.क्र.१३७/ई-८,दि.२६/०३/२०१९.

६) सामान्य प्रशासन विभाग,पत्र क्र.टिआरएन-१०२१/प्र.क्र.३०/सीपीटीपी- ब,दि.०५/१०/२०२१.

**प्रस्तावना :-**

सामान्य प्रशासन विभागाच्या संदर्भ क्र.२ येथील शासन निर्णयान्वये महाराष्ट्र लोकसेवा आयोगामार्फत राज्यसेवा परीक्षेद्वारे प्रतिवर्षी सरळ सेवेने नियुक्त होणाऱ्या “गट-ब” संवर्गातील उमेदवारांसाठी वनामती, नागपूर या संस्थेमार्फत एकत्रित परिविक्षाधीन प्रशिक्षण देण्यात येते. त्यानुसार राज्यसेवा (मुख्य) परीक्षा-२०१७ द्वारे सरळसेवेने नियुक्त झालेले २५ नायब तहसिलदार गट-ब संवर्गातील एकूण २५ अधिसंख्य पदे दिनांक ३०/०९/२०१९ ते दिनांक ३०/०९/२०२१ या दोन वर्षाच्या कालावधीकरीता निमार्ण करण्यास उपरोक्त संदर्भ क्र.०५, दिनांक २६/०३/२०१९ अन्वये मान्यता देण्यात आली आहे.

सामान्य प्रशासन विभाग, दिनांक ०५/१०/२०२१ रोजीच्या पत्रान्वये सीपीटीपी-५ मधील “गट-ब” संवर्गातील प्रशिक्षणार्थी परिविक्षाधीन अधिकाऱ्यांचा सत्र ३ व ४ च्या परीक्षेचा निकाल अदयाप जाहीर झालेला नाही. सदर निकाल जाहीर होऊन संबंधित प्रशिक्षणार्थ्यांची सेवाज्येष्ठता निश्चित करण्यासाठी काही कालावधी लागण्याची शक्यता आहे, ही बाब विचारात घेता, सीपीटीपी-५ मधील “गट-ब” संवर्गातील २५ परिविक्षाधीन अधिकारी सद्य:स्थितीत ज्या ठिकाणी खातेनिहाय जिल्हा प्रशिक्षण घेत आहेत, त्या ठिकाणी त्यांना ज्येष्ठतेनुसार संवर्ग वाटप होईपर्यंत त्यांच्या अधिसंख्य पदांना मुदतवाढ देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

राज्यसेवा (मुख्य) परीक्षा-२०१७ मध्ये महाराष्ट्र लोकसेवा आयोगाने शिफारस केलेल्या व सामान्य प्रशासन विभागाने प्रशिक्षणांतर्गत कार्यक्रमासाठी नियुक्त केलेल्या २५ परिविक्षाधीन नायब तहसिलदार, “गट-ब” संवर्गातील एकूण २५ अधिसंख्य पदांना सद्य:स्थितीत ज्या ठिकाणी खातेनिहाय जिल्हा प्रशिक्षण घेत आहेत, त्याच ठिकाणी त्यांना ज्येष्ठतेनुसार संवर्ग वाटप होईपर्यंत मुदतवाढ देण्यास शासन मान्यता देत आहे.

२. उपरोक्त एकुण २५ अधिसंख्य पदाच्या एकत्रित परिविक्षाधीन उमेदवारांना ज्येष्ठतेनुसार विभागीय संवर्ग वाटप होईपर्यंत, सदर अधिसंख्य पदांवर होणारा खर्च सन २०२१-२२ या वित्तीय वर्षात “ मागणी क्र.सी-१,२०५३-जिल्हा प्रशासन(००)(०९३) जिल्हा आस्थापना (०१) सर्व साधारण आस्थापना (०१)(०१) आयुक्त, कोकण (२०५३ ००२८)/आयुक्त, नाशिक (२०५३ ००४६) / आयुक्त, पुणे (२०५३००६४) /आयुक्त, अमरावती (२०५३ ००८२)/आयुक्त,नागपूर (२०५३ ०१०८)/आयुक्त,औरंगाबाद (२०५३ ०१२६) या लेखाशिर्षाखालील चालू वित्तीय वर्षासाठी मंजूर अर्थसंकल्पीय अनुदानातुन भागविण्यात यावा.

३. शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांक पदनि-२०१६/प्र.क्र.७/१६/वित्तीय सुधारणा-१, दिनांक २०/०२/२०१६ अन्वये प्रशासकीय विभागांना प्रदान करण्यात आलेल्या अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक २०२११२१४१५५९३१८९१९ असा आहे. उक्त शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,**

Atul Ashok Kode

Digitally signed by Atul Ashok Kode
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Revenue and Forest Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=a12403ed93b05957cb29b7e95265d3ac52d366233b80405514f23a879132aeec, cn=Atul Ashok Kode
Date: 2021.12.14 17:07:37 +05'30'

**( अतुल कोदे )**
**सह सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) विभागीय आयुक्त, नागपूर विभाग, नागपूर.
२) जिल्हाधिकारी (सर्व).
३) महासंचालक, वसंतराव नाईक राज्य कृषि विस्तार व्यवस्थापन व प्रशिक्षण संस्था, नागपूर.
४) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
५) निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई.
६) जिल्हा कोषागार अधिकारी (सर्व)

७) प्रधान महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता / लेखापरीक्षा), महाराष्ट्र - १/२, मुंबई/नागपूर.

८) उप सचिव (वित्तीय सुधारणा-१) वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई - ३२.

९) उप सचिव ( सीपीटीपी-ब) सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई - ३२.

१०) सह सचिव (कार्यासन ब-१/ई-९) महसूल व वन विभाग, मंत्रालय,मुंबई - ३२.

११) निवड नस्ती, कार्यासन ई-८, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई - ३२.